**कविकुलगुरु कालिदास संस्कृत विश्वद्यालय, रामटेक विद्यापीठात NME-ICT या प्रकल्पास प्रशासकीय मान्यता तसेच निधी वितरीत करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**

उच्च व तंत्रशिक्षण विभाग

शासन निर्णय क्रमांक: केएसयु २०११/(८३/११)/विशि-२

मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : ३० डिसेंबर, २०११.

<u>पहा</u>:-१) शिक्षण संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. युएनआय/२०११/कसंस्कृवि/तरतूद/ यो.यो. विशि-१/२६३८, दिनांक २६.०७.२०११

२) कुलसचिव, कविकुलगुरु कालिदास संस्कृत विश्वद्यालय, रामटेक यांचे पत्र क्र: ककासंवि/२०११/ तं.नि./१४०८, दिनांक १३.०९.२०११

<u>प्रस्तावना</u> :

कविकुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालय, रामटेक या विश्वविद्यालयामध्ये NME-ICT हा प्रकल्प राबविण्याचे प्रस्तावित असून संदर्भाधीन पत्र क्रमांक १ व २ अन्वये शासनास सादर केला आहे. सदर योजना ही नवीन योजना असून हा NME-ICT प्रकल्प हा देशातील विद्यापीठे व शैक्षणिक संस्थांना Computer Network द्वारे जोडण्याकरीता स्थापीत केलेली केंद्रशासनाची संस्था असून ही संपर्क व e- contents पुरवठा करणारी संस्था आहे. या प्रकल्पांतर्गत भारत संचार निगम लिमिटेड (B.S.N.L.) च्या सहाय्याने सर्व विद्यापीठे व विविध शैक्षणिक संस्थांना National Knowledge Network (NKN) सोबत जोडण्यात येणार आहे. तसेच NKN सह जोडल्या गेलेलेया सर्व विद्यापीठांना e- contents उपलब्ध करुन देऊन Teacher Empowerment Teaching & Leaving activities ला सशक्त बनविण्यासाठी प्रयत्न होणार आहेत. या प्रणालीद्वारे जोडलेल्या शैक्षणीक संस्थांना उच्च गुणवत्तेचा e- contents चा पुरवठा होणार असून किमान १० वर्षापर्यंत निः शुल्क स्वरुपात अध्यापक, संशोधक व विद्यार्थ्यांना आपले ज्ञान अद्ययावत करण्यास तसेच शैक्षणिक गुणवत्तेचा विकास साधण्यास सहाय्यक होणार आहे. NKN च्या माध्यमातून भारतातील माहिती व तंत्रज्ञान प्रणालीला चालना देणा-या नामंकीत केंद्राच्या Connectivity ची सुविधा विद्यापीठातील अभ्यासकांना प्राप्त होणार आहे. या प्रकल्पाचा एकूण खर्च रुपये २००.०० लक्ष असून त्यापैकी केंद्रशासन व भारत संचार निगम लिमिटेड मिळून रुपये १५०.०० लक्ष (७५ टक्के) व राज्य शासन रुपये ५०.०० लक्ष (२५ टक्के) खर्च अपेक्षित आहे. राज्य शासनाच्या हिश्याची रुपये ५०.०० लक्ष रक्कम ५ वर्षात टप्प्या-टप्प्याने भारत संचार निगम लिमिटेडकडे वर्ग करावयाची आहे..

या योजनेस प्रशासकीय मान्यता देणे तसेच या योजनेसाठी सन २०११-२०१२ करीता निधी उपलब्ध करुन देण्याचा प्रस्ताव प्रस्तुत नस्तीवर विचाराधिन होता.

**<u>शासन निर्णय</u> :-** प्रस्तुत प्रकरणी प्रस्तावनेत नमूद बाबी विचारात घेवून कविकुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालय, रामटेक या विश्वविद्यालयामध्ये NME-ICT हा प्रकल्प सर्वकंषपणे राबविण्याच्या दृष्टीकोनातून प्रशासकीय मान्यता देण्यास तसेच सन २०११-२०१२ मध्ये या योजनेसाठी रुपये १०.०० लक्ष (रुपये दहा लक्ष फक्त) इतकी तरतूद सदर विश्वविद्यालयास वितरित करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२.	सदरहू मंजूर झालेली तरतुद खर्च करण्याची सर्वस्वी जबाबदारी कविकुलगुरु कालिदास विद्यापीठ, रामटेक यांची राहील. वरील अनुदानाची सर्व कागदपत्रे व हिशेब महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई किंवा प्रकरणपरत्वे महालेखापाल -२ नागपूर त्यांनी सदर कामाकरीता प्राधिकृत केलेले अधिकारी यांना तपासण्याचे अधिकार असून, त्यांनी मागणी केल्यास, सर्व कागदपत्रे त्यांच्याकडे तपासणी करीता विद्यापीठाने सादर केली पाहिजेत. विद्यापीठास ज्या उद्दिष्टासाठी मंजुर केलेल्या अनुदानाचा वापर त्याच उद्दिष्टासाठी करावा आणि त्याबाबतचे विनियोजन प्रमाणपत्र (Utilisation Certificate) संबंधितांना विहित वेळेत सादर करण्याची दक्षता घेण्यात यावी.

३.	सदर खर्च " मागणी क्रमांक - डब्ल्यु-२, २२०२-सर्वसाधारण शिक्षण ०३, विद्यापीठीय व उच्च शिक्षण १०४, विद्यापीठांना सहाय्य, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना १०२, विद्यापीठांना सहाय्य, (००) (१४) कवी कालिदास संस्कृत विद्यापीठ, नागपूर यांचा विकास (२२०२ ३४९५), ३१ सहाय्यक अनुदान (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली खर्च घालण्यात यावा.

४.	हा शासन निर्णय, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग पहिला उप विभाग तीन मधील अ.क्र. ४-नियम क्रमांक २७(२) (अ) नुसार प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारान्वये आणि वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र. अंदाज २०.११/प्र.क्र.९३/२०११/अर्थसंकल्प-३, दिनांक २१.०९.२०११ अन्वये प्राप्त झालेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५.	हा शासन निर्णय महाराष्ट्र शासाच्या www.maharashtra.govt.in या संकेत स्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०११२२२९०९२२४२१२४२००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

( वि. मा. पाटील)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) मा. राज्यपाल तथा कुलपती यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हील, मुंबई,
२) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
३) सह संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, नागपूर,
४) कुलगुरु, कविकुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालय, रामटेक, नागपूर
५) कुलसचिव, कविकुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालय, रामटेक, नागपूर
६) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)-१/२ महाराष्ट्र, मुंबई / नागपूर
७) महालेखापाल, (लेखा परीक्षण) -१/२ महाराष्ट्र, मुंबई / नागपूर
८) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर/ पुणे .
९) नियोजन विभाग, (का-१४७१) मंत्रालय, मुंबई.
१०) वित्त विभाग,(व्यय-५) ( अर्थसंकल्प-३/८) मंत्रालय, मुंबई.
११) मा. प्रधान सचिव,उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
१२) उप सचिव (विशि), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
१३) अवर सचिव (साशि-१), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई,
१४) निवड नस्ती (विशि-२), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.